**विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती येथील टप्पा-१ व टप्पा-२ ची अस्थाई पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः पदआ - २०१८ /प्र.क्र.८२ /आरोग्य-३

१० वा मजला, संकुल इमारत,
गो.ते.रुग्णालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: २२ ऑक्टोबर,२०१८

वाचा -

१) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक -पदआ २०१८ /प्र.क्र.८२/आरोग्य -३, दिनांक- ०६.०४.२०१८**

२) **आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक- संआसे/कक्ष-३/टे-५अ/२०१८-१८/अकोला/अपदे/२९७४-७५/१८, दिनांक-२१.०३.२०१८.**

## शासन निर्णय-

उपरोक्त अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला यांच्या अधिपत्याखालील विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती येथील टप्पा- १ च्या ३१९ व टप्पा-२ च्या २७८ अस्थाई पदांना दि.०१.०३.२०१८ ते दि.३०.०९.२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

२. आता या शासन निर्णयान्वये विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती येथील सदर टप्पा- १ च्या ३१९ व टप्पा-२ च्या २७८ अस्थाई पदांना दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१८-२०१९ या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक-आर-१**

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१ - नागरी आरोग्य सेवा - विषम चिकित्सा
११० - रुग्णालये व दवाखाने
११०-७ - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना

(०६)(२१) - मुसफल विभागाच्या मुख्यालयाच्या ठिकाणी विशेष संदर्भ सेवा केंद्र स्थापन करणे (२२१० ४२५९)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक,दिनांक- ०७.०९.२०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१९१७४७५४३४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2018.10.22 12:49:23 +05'30'

**(रो.दि.कदम पाटील)**
अवरसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई नागपूर
२. संचालक,आरोग्य सेवा, मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा, (राज्यस्तर) मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, अमरावती.
७. वैद्यकीय अधिक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
८. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
९. कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/ सेवा-५/अर्थसंकल्प, सा.आ.वि. मंत्रालय,मुंबई.
१०. निवडनस्ती (आरोग्य-३)